**महाराष्ट्र संशोधन उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत) या संस्थेवर नियुक्त केलेल्या नियमित पदांना वेतन अदा करण्यासाठी अनुदान वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. अमृत २०२२/प्र.क्र.०१/संस्था**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १५ मार्च, २०२३

वाचा- १. शासन निर्णय, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र. प्रसंस्था-२०१९/प्र.क्र. १००/ महामंडळे, दि. २२.०८.२०१९
२. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. अमृत २०२१/प्र.क्र.५२/संस्था,दि. ३०.०८.२०२२
३. अमृत संस्थेच्या कार्यकारी समितीच्या ( बोर्ड ऑफ गव्हर्नस) दिनांक २७.२.२०२३ च्या बैठकीचे इतिवृत्त, दि.५.३.२०२३
४. व्यवस्थापकीय संचालक, अमृत यांचे दिनांक १३.३.२०२३ चे पत्र

**प्रस्तावना :-**

राज्यातील खुल्या प्रवर्गातील आर्थिक दृष्टया दुर्बल घटकातींल विदयार्थी, युवक, युवती इत्यादीचा विकास घडविण्याकरीता महाराष्ट्र संशोधन उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत) (Academy of Maharashtra, Research, Upliftment and Training (AMRUT) संस्था स्थापन करण्यास संदर्भ क्र. १ येथे नमूद दिनांक २२.८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. अमृत संस्थेच्या आस्थापनेवर दिनांक ३०.८.२०२२ च्या शासन निर्णयान्वये ३ नियमित व १७ बाहयस्त्रोताव्दारे भरण्यास शासन मान्यता दिली आहे. त्यानुसार सदयस्थितीत व्यवस्थापकीय संचालक हे पद भरले आहे व उर्वरित नियमित पदे भरण्याची कार्यवाही सुरु आहे. व्यवस्थापकीय संचालक यांनी संदर्भ क्र. ४ येथे नमूद पत्रान्वये केलेल्या विनंती नुसार अमृत संस्थेतील नियमित पदांवर नियुक्त अधिकाऱ्यांच्या वेतनासाठी रु.५५.१२ लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

व्यवस्थापकीय संचालक यांनी संदर्भ क्र. ४ येथे नमूद पत्रान्वये केलेल्या विनंती नुसार अमृत संस्थेच्या आस्थापनेवर दिनांक ३०.८.२०२२ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या नियमित पदांवरील नियुक्त अधिकाऱ्यांच्या वेतनासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात मागणी क्र. झेडजी २२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण (०१) (१०), महाराष्ट्र संशोधन उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत) (कार्यक्रम), ३६ सहायक अनुदाने (वेतन) (२२२५ एफ ५३२ ) या लेखाशीर्षाखाली मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून रु.५५.१२ लाख ( रुपये पंचावन्न लाख बारा हजार फक्त ) इतका निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

सदर निधी खर्च केल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate) वेळोवेळी शासनास सादर करणे आवश्यक राहील.

सदर निधी वितरीत करण्यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव ( संस्था ) यांना व कक्ष अधिकारी (रोखशाखा ) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१५१५४१५८८२३४ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c550dd52f3943153bdbd47e381bb9818c91359bd0588e1b35b3c0c18ad7bf938, pseudonym=B6DDBEDBC1E63E4332429DB625320D8F56899C89, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2023.03.15 15:51:15 +05'30'

**( कैलास साळुंके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित:-**

१) मा. राज्यपालांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई
४) मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६) अध्यक्ष, महाराष्ट्र संशोधन, उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत),मुंबई
७) सर्व मंत्रालयीन विभागांचे अमुस/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
८) व्यवस्थापकीय संचालक, अमृत, पुणे
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ /२ महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
१०) उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
११) कक्ष अधिकारी (रोखशाखा), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय,मुंबई
१३) निवडनस्ती.